सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेंतर्गत निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०२१ /प्र.क्र १३४ /एसडी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १० नोव्हेंबर, २०२१.

**वाचा**

१. शासन निर्णय क्रमांक - पीआरई २०११/प्र.क्र. २४९/प्राशि-१, दिनांक ०१.१०.२०१३.
२. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
३. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं/ रागांविअसाअयो /२०२१-२२/अं-२०४/३२११, दि.२९.०९.२०२१.

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र. ०१ येथील दि.०१.१०.२०१३ च्या शासन निर्णयानुसार इयत्ता १ ली ते १२ वी पर्यंत शिकणाऱ्या मुला/मुलींना अपघातामुळे क्षतीची नुकसान भरपाई देण्यासाठी “ राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजना” नियमित स्वरुपात राबविण्यात येते. सदर शासन निर्णयान्वये विद्यार्थ्याचा अपघात झाल्यास अनुज्ञेय सानुग्रह अनुदान व यासाठी आवश्यक कागदपत्रे नमूद करण्यात आली असून याबाबतचे प्रस्ताव निकाली काढण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे.

राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान योजनेंतर्गत राज्यातील ३७० लाभार्थ्यांना अनुदान देण्यासाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात रु.२.७४३५ कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी विद्यार्थी अपघात सानुग्रह अनुदान या योजनेसाठी रु.१२.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित असून यापैकी रु.२.७४३५ कोटी (रुपये दोन कोटी चौऱ्याहत्तर लाख पस्तीस हजार मात्र) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च “मागणी क्र. ०२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०० इतर खर्च (०६) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (०६)(०२) राज्यातील विद्यार्थ्यांसाठी अपघात विमा योजना (२२०२ ३१०९), कार्यक्रम ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

४. संदर्भ क्र. ०१ येथील शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

५. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे हे नियंत्रक अधिकारी असल्याने त्यांनी सर्व आहरण व संवितरण अधिकारी असलेल्या जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) यांना संदर्भ क्र. ०२ येथील वित्त विभागाच्या दि.१४.१०.२०२१ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटींची पूर्तता करून तरतूद वितरीत करण्याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौ.सं. क्र.३०८/१४७१, दि.१४.१०.२०२१ व वित्त विभाग अनौ.सं. क्र.९४२/२०२१/व्यय-५, दि.२२.१०.२०२१ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११११०१६३७४७१७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: CN = RAJENDRA SHANKARRAO PAWAR, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT
Date: 2021.11.10 16:42:44 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२.मा.मुख्यमंत्री/मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४.मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६.मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
९. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१०.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
११. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१३. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर

१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. सर्व जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)
१६. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१७.शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक/ उच्च माध्यमिक)
१८. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६. निवड नस्ती (एसडी-६)